GR-200408121510150001-2402

महाराष्ट्र राज्यातील अशासकीय तंत्र माध्यमिक शाळेतील शिक्षक/शिक्षकेतर तसेच +२ स्तरावरील अशासकीय अनुदानित व्दिलक्षी व किमान कौशल्यावर आधारीत व्यवसाय अभ्यासक्रमातील . शिक्षकेत्तर कर्मचा-यांना कालबध्द पदोन्नती योजना मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
*शासन निर्णय क्र.टिएसए-१००२/( २७३७)/व्यशि-४*
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१२/७/२००४

वाचा:- १)शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-१०९५/प्र.क्र.६/९५/१२,दि.८ जून,१९९५.
२)शासन निर्णय,शालेय शिक्षण विभाग,क्र.एसएसएन-२६९५/(५५०)/मासि-२,दि.३०/४/१९९८
३)शासन निर्णय,शालेय शिक्षण विभाग,क्र.एसएसएन-२६९५/(६५७)/ मासि-२,दि.२३/७/१९९८

**शासन निर्णय :-** शासन सेवेतील पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसलेल्या गट " क " व गट "ड " मधील कर्मचा-यांच्या सेवेतील कुंठीतता घालविण्यासाठी या कर्मचा-यांना १२ वर्षाच्या सेवेनंतर कालबध्द पदोन्नतीने वरिष्ठ वेतनश्रेणी देण्याची योजना सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त दि.८ जून,१९९५ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेली आहे.तसेच राज्यातील खाजगी शाळातील शिक्षकेतर कर्मचा-यांना शालेय शिक्षण विभागाच्या उपरोक्त दि.३० एप्रिल,१९९८ च्या शासन निर्णयान्वये कालबध्द पदोन्नतीची योजना लागू करण्यात आलेली आहे.राज्यातील अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा तसेच +२ स्तरावरील अशासकीय अनुदानित संस्थातील व्दिलक्षी व किमान कौशल्यावर आधारित व्यवसाय अभ्यासक्रमाकडील शिक्षकेतर कर्मचा-यांना ज्या पदावर नेमणूक होईल त्या एकाच पदावर दिर्घ कालावधीची सेवा करुन निवृत्त व्हावे लागते व त्यांना कोणत्याही प्रकारची पदोन्नतीची संधी मिळत नाही.त्यामुळे अशा कर्मचा-यांना उपरोक्त प्रमाणे कालबध्द पदोन्नती योजना लागू करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा तसेच +२ स्तरावरील अशासकीय अनुदानित संस्थातील व्दिलक्षी व किमान कौशल्यावर आधारित व्यवसाय अभ्यासक्रमाकडील वर्ग-क व वर्ग-ड

ज्या ज्या कर्मचा-यांना १२ वर्षाच्या नियमित सेवेनंतर त्यांच्या पदोन्नती साखळीतील पदावर पदोन्नतीसाठी पद अस्तित्वात नाही,अशा सर्व कर्मचा-यांना कालबध्द वेतनश्रेणी देण्यात येईल.या योजनेची इतर प्रमुख वैशिष्टये व अंमलबजावणीची कार्यपध्दती खालीप्रमाणे आहे:-

१) ही योजना दि.१ जून,२००४ पासून अंमलात येईल.

२)या योजनेअंतर्गत वरिष्ठ श्रेणी मिळण्यासाठी पदोन्नतीसाठी विहीत कार्यपध्दती ज्येष्ठता,पात्रता,तशी विहीत केली असल्यास अर्हता,विभागीय परीक्षा इ.बाबींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

३)सरळ सेवेने प्रविष्ठ झालेल्या अथवा पदोन्नतीने नियुक्ती झालेल्या कर्मचा-यांच्या बाबतीत संपूर्ण सेवा कालावधीत एकदाच या योजनेअंतर्गत वरिष्ठ श्रेणी अनुज्ञेय राहील.

४)ज्या कर्मचा-यांना दोन पेक्षा जास्त पदोन्नती मिळाली आहे अशा कर्मचा-यांना या योजनेअंतर्गत वरिष्ठ श्रेणीचा लाभ मिळणार नाही.

५)नाईक,माळी (वर्ग-ड मधील) कर्मचारी इ.निम्नश्रेणी कर्मचा-यांना वरिष्ठ वेतनश्रेणी दिली तर त्यांचे सेवानिवृत्तिचे वय ६० वर्ष हेच असेल,मात्र वर्ग-ड च्या पदाव्यतिरिक्त इतर पदावर ज्यांना नियमित पदोन्नती मिळाली असेल त्यांच्या सेवानिवृत्तिचे वय ५८ वर्ष राहील.

६)या पदोन्नतीमुळे जबाबदारी आणि कर्तव्ये यात वाढ होत नसली तरी नियमित पदोन्नतीप्रमाणे वेतननिश्चितीचा लाभ देता येईल.मात्र, वेतननिश्चितीत मिळालेला हा लाभ त्याच वेतनश्रेणीत कार्यात्मक पदोन्नती मिळाल्यानंतर पुन: देय होणार नाही.

७)कर्मचा-यास विशेष वेतन मिळत असेल तर या योजनेतील पदोन्नती नंतर कर्मचा-यास मूळ वेतनश्रेणीतील विशेष वेतन अनुज्ञेय राहणार नाही.

८) या योजनेंतर्गत पदोन्नती मिळाली तरी कर्मचा-याचे नांव कनिष्ठ (मूळ संवर्ग)च्या ज्येष्ठता सूचीत पूर्ववत राहील.तसेच सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार उपलब्ध रिक्ततेत योग्य वेळी नियमित पदोन्नतीसाठी यांचा विचार करण्यात येईल.नियमित पदोन्नतीस अपात्र ठरलेल्या कर्मचा-यास या योजनेचा लाभ मिळणार नाही.

९)नियमित पदोन्नती नाकारलेल्या कर्मचा-यास या योजनेचा लाभ मिळणार नाही.तसे बंधपत्र कर्मचा-याकडून लिहून घेण्यात येईल.

१०)संबधीत कर्मचा-यांना १२ वर्षाची सेवा पूर्ण करणा-या कर्मचा-याच्या अलिकडील वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या आधारे वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झाल्यानंतरच देण्यात यावा.

३. या सुधारित वेतनश्रेण्यांमुळे होणारा अतिरिक्त खर्च संबधीत कर्मचा-याच्या वेतन व भत्ते या संबधीचा खर्च ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येतो,त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.संचालक(व्यवसाय शिक्षण) यांनी सुधारित अंदाज तयार करताना सदर अतिरिक्त खर्च विचारात घ्यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५७१/सेवा-३,दि.१८/१०/२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(मनीषा शिंदे)
उपसचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत:-

१)संचालक(व्यवसाय शिक्षण),व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई-१

२)प्र.संचालक(प्रशिक्षण),व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई-१

३)शिक्षण संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे.

४)सर्व उपसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण,प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद,नागपूर ,अमरावती.

५)सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.

६)महालेखापाल,महाराष्ट्र -१/२(लेखा व अनुज्ञेयता),(लेखा परीक्षा),मुंबई/नागपूर.

७)अधिदान व लेखाधिकारी/निवासी लेखाधिकारी,मुंबई.

८)संचालक,लेखा कोषागारे,महाराष्ट्र राज्य,मुंबई.

९)सर्व जिल्हयांचे कोषागार अधिकारी.

१०)सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी,महाराष्ट्र राज्य.

११)सर्व प्राचार्य,खाजगी अनुदानित कनिष्ठ व्यवसाय शिक्षण महाविद्यालये,महाराष्ट्र राज्य.

१२)सर्व मुख्याध्यापक,खाजगी अनुदानित तंत्रशिक्षण शाळा/उच्च माध्यमिक तंत्रशिक्षण शाळा,महाराष्ट्र राज्य.

१३)वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.

१४)शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.

१५)सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.

१६)उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,मंत्रालय,मुंबई.

१७)निवड नस्ती,व्यशि-४.